**सागरी क्षेत्रातील शिंपले व कालव संवर्धनाकरीता राबवावयाच्या प्रकल्पास प्रशासकीय मान्यता...**

**सन २०१७-१८ साठी राष्ट्रीय कृषी विकास योजनेअंतर्गत अर्थसहाय्य...**

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि २०१७/प्र.क्र. १३७ /पदुम १४**

मंत्रालय, मुंबई ४०००३२

दिनांक: ३ जुलै, २०१७

**वाचा:-** १) आयुक्त मत्स्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. मत्स्य/ भू/०२०९०१/०८/२०१७, दि. २०.०१.२०१७

२) कृषि व पदुम विभाग पत्र क्र. RKVY-१२१६/C.R. १४६/RKVY CELL, दि. ०८.०५.२०१७

३) कृषि व पदुम विभाग पत्र क्र. आरकेव्ही-०३१७/प्र.क्र.१४/आरकेव्हीवाय सेल, दि.९.६.२०१७

**प्रस्तावना -**

राज्याला ७२० कि.मी. चा सागरी किनारा लाभलेला असून सदर सागरी किनाऱ्यावर ७० खाडया आहेत. राज्यातील सध्याचे सागरी मत्स्योत्पादन सुमारे ४.५ लक्ष मेट्रीक टन असून उत्पादीत होणारे सागरी मत्स्योत्पादन हे बहुप्रजातीय आहे. या बहुप्रजातीय मत्स्योत्पादनात इतर मत्स्यजातीच्या तुलनेत शिंपले उत्पादनाचे प्रमाण हे अत्यल्प आहे. शिंपले संवर्धनाकरीता महाराष्ट्रात समुद्र किनारी व खाडीक्षेत्रात विपुल प्रमाणात क्षेत्र उपलब्ध आहे. त्यामुळे या क्षेत्रात नैसर्गिक उत्पादना व्यतिरिक्त नियंत्रीत पध्दतीने शिंपले व कालवं बीजांचे रोपण करणे शक्य आहे. शिंपले व कालव संवर्धन हे कमी भांडवली गुंतवणूकीमध्ये जास्त उत्पन्न मिळवून देणारा व्यवसाय आहे. शिंपले व कालवं संवर्धनाद्वारे महिला स्वंयसहाय्यता बचत गटांना तसेच मच्छीमार महिलांना स्वयं रोजगाराद्वारे पुरक व्यवसाय उपलब्ध करून देऊन मच्छिमारांचा सामाजिक-आर्थिक दर्जा उंचावण्यास मदत होईल. याशिवाय शिंपल्यांच्या निर्यातीच्या माध्यमातून परकीय चलन प्राप्त होवून अतिरिक्त उत्पन्नाचा स्त्रोत उपलब्ध करून देणे शक्य होणार आहे.

उक्त वस्तुस्थिती लक्षात घेऊन संदर्भाधीन १ येथील पत्रान्वये आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी राज्यातील ७ सागरी जिल्ह्यातील (पालघर, ठाणे, मुंबई उपनगर, मुंबई शहर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग) मच्छिमारांसाठी रू.५.१५ कोटी इतक्या रकमेचा सविस्तर प्रकल्प अहवाल राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अर्थसहाय्याकरिता शासनास सादर केला होता. सदर प्रकल्प अहवाल दि. १३.०१.२०१७, दि. ०४.०२.२०१७ व दि. ०३.०३.२०१७ रोजीच्या राज्यस्तरीय प्रकल्प छाननी समितीसमोर सादर करण्यात आले असता संदर्भाधीन क्र २ येथील पत्रान्वये निर्गमीत करण्यात आलेल्या इतिवृत्तांन्वये त्यास मान्यता देण्यात आलेली आहे. तद्नंतर सदर प्रस्ताव दि. २५.०५.२०१७ रोजीच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीसमोर ठेवण्यात आले असता त्यास संदर्भाधीन क्र. ३ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांनी सादर केलेला प्रस्ताव व राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समितीने दिलेली मान्यता लक्षात घेता राज्यात उपरोक्त ७ जिल्हयामध्ये रु.५.१५ कोटी रक्कमेचा प्रकल्प राबविण्याच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

शासन या निर्णयान्वये, राज्यातील पालघर, ठाणे, मुंबई उपनगर, मुंबई शहर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग या ७ सागरी जिल्हयांमध्ये सागरी क्षेत्रात मत्स्यसंवर्धन/पिंजरा पध्दतीने शिंपले संवर्धनासाठी सन २०१७-१८ साठी राष्ट्रीय कृषी विकास योजना (RKVY) अंतर्गत अर्थसहाय्यातून रु.५.१५ कोटी इतक्या

रक्कमेचा प्रकल्प प्रस्ताव राबविण्यास शासन प्रशासकीय मान्यता देत आहे. यासाठी राकृवियो हिस्सा व लाभार्थी हिस्सा ५०:५० या प्रमाणात राहणार असून, राष्ट्रीय कृषी विकास योजना (RKVY) अंतर्गत मंजूर निधीचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

| **अ.क्र** | **घटक** | **प्रकल्प किंमत** | **राकृवियो हिस्सा** | **लाभार्थी हिस्सा** |
|---|---|---|---|---|
| १ | कालव संवर्धन (Oyster farming) | २,९४,००,००० | १,४७,००,००० | १,४७,००,००० |
| २ | शिंपले संवर्धन (Mussel farming) | २,२०,५०,००० | १,१०,२५,००० | १,१०,२५,००० |
| ३ | इतर | ५०,००० | २५,००० | २५,००० |
| | एकूण | ५,१५,००,००० | २,५७,५०,००० | २,५७,५०,००० |

सदर प्रकल्प अंमलबजावणीच्या अटी/ शर्ती खालीलप्रमाणे राहतील-

१)सदर प्रकल्पांसाठी निकष व अर्थसहाय्याचे स्वरुप हे केंद्र शासनाच्या निलक्रांती योजनेनुसार राहतील.

२)आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे उपरोक्त प्रकल्पाचे संनियंत्रण अधिकारी राहतील.

३)प्रकल्प विहित कालावधीत पूर्ण करण्याची व उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्याची जबाबदारी ही आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांची राहील.

४)लाभार्थी निवडीकरिता खालीलप्रमाणे जिल्हास्तरीय समिती गठित करण्यात येत असून प्रकल्पाची योग्यरित्या अंमलबजावणी करण्याची जबाबदारी समितीची असेल.

१) सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय - अध्यक्ष
२) संबंधित जिल्हाधिकारी यांचे प्रतिनिधी - सदस्य
३) मुख्य वन संरक्षक, कांदळवने यांचा प्रतिनिधी - सदस्य
१) मत्स्यव्यवसाय विकास अधिकारी - सदस्य सचिव

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०३१६५७०३०३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shri Ravindra Gurav

Digitally signed by Shri Ravindra Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, cn=Shri Ravindra Gurav
Date: 2017.07.03 16:57:03 +05'30'

**(रविंद्र गुरव)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
३. मा. राज्यमंत्री(पदुम) यांचे खाजगी सचिव
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा व विधानपरिषद.
५. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई

८. सहायक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, पालघर, ठाणे, मुंबई उपनगर, मुंबई शहर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग
९. महालेखापाल १/२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) मुंबई / नागपूर
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर, ठाणे, मुंबई उपनगर, मुंबई शहर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग
११. उप कोषागार अधिकारी, पालघर, ठाणे, मुंबई उपनगर, मुंबई शहर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग
१२. सहसंचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर,मुंबई
१३. अवर सचिव/ कक्ष अधिकारी (राकृवियो कक्ष,पदुम १२, पदुम १४, पदुम १६)
१४. निवडनस्ती